अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता व बांधकामाकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.....

सन २०२१-२२ करिता निधी वाटप

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वसगृ - २०२१/प्र.क्र.३५/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ फेब्रुवारी, २०२२

**वाचा:**
१) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि २००९/प्र.क्र.१५/का.८, दि. ०२ मार्च, २०१०.
२) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का.८, दि. २० डिसेंबर, २०११,
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१, दि. १४ ऑक्टोबर, २०२१
४) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र.वसगृ-२०२१/प्र.क्र.३५/का-८, दि.२७ ऑगस्ट, २०२१ व दि.७ डिसेंबर, २०२१
५) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०१३/प्र.क्र.१४४/का-८, दि.१६ डिसेंबर, २०२१
६) निवासी उपजिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली यांचे पत्र क्र.साशा- १/प्रशा/आरआर/१०१६/२०२१, दि.१४ ऑक्टोबर, २०२१
७) प्राचार्य, राजाराम महाविद्यालय कोल्हापुर यांचे पत्र क्र.आस्था/अल्पसं/२०२१-२०२२/५८२, दि.१८जून, २०२१

**प्रस्तावना -**

राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतिगृहे बांधण्याबाबतचा शासन निर्णय, दिनांक २ मार्च, २०१० रोजी निर्गमित करण्यात आला आहे. राज्यातील विविध विद्यापीठांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीवर अल्पसंख्याक मुलींसाठी वसतिगृह बांधण्यासंदर्भातील कार्यपध्दती दिनांक २० डिसेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे. तसेच अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांकरिता बांधण्यात येत असलेल्या वसतिगृहांच्या व्यवस्थापनाबाबत कार्यपध्दती दिनांक २१ जून, २०१३ व दिनांक २८ जुलै, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे.

२. अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृह बांधकाम करण्याकरिता सन २०२१-२२ करिता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु.३०,००,००,०००/- इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भ ५. येथील शासन निर्णयान्वये शासकीय तंत्रनिकेतन, भांबुर्डा, शिवाजीनगर, पुणे येथील वसतिगृहाच्या फर्निचर खरेदीकरिता रु.२,४२,५८,२७६/- इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.६ व ७ च्या पत्रांन्वये निवासी उपजिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली व प्राचार्य, राजाराम महाविद्यालय कोल्हापुर यांनी अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता निधी वितरीत करण्याची मागणी केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयास अनुसरुन सदरचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय -</u>**

जिल्हाधिकारी, पुणे, सांगली व कोल्हापुर यांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयास अनुसरून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता आवश्यक असणारा कार्यक्रमावरील खर्चासाठी एकुण रु. २,७१,१८,२७६/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकाहत्तर लाख अठरा हजार दोनशे शहात्तर फक्त) निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | वसतिगृहाचे ठिकाण | प्रस्तावित निधी |
|---|---|---|
| | **व्यवस्थापनाकरिता** | |
| १. | राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर | रु.१७,३०,०००/- |
| २. | शासकीय तंत्रनिकेतन, मिरज, जिल्हा-सांगली | रु.११,३०,०००/- |
| | **फर्निचरकरिता** | |
| ३. | शासकीय तंत्रनिकेतन, भांबुर्डा, शिवाजीनगर, पुणे | रु.२,४२,५८,२७६/- |
| | **एकूण** | रु.२,७१,१८,२७६/- |

४. वरीलप्रमाणे जिल्हाधिकारी, पुणे, सांगली व कोल्हापुर यांना त्यांच्या अधिपत्याखालील उपरोक्त तक्त्यात नमुद अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या फर्निचरसाठी व व्यवस्थापनासाठी एकूण रु. २,७१,१८,२७६/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकाहत्तर लाख अठरा हजार दोनशे शहात्तर फक्त) एवढी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

५. सदर तरतूद जिल्हाधिकारी, पुणे, सांगली व कोल्हापुर यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता जिल्हाधिकारी, पुणे, सांगली व कोल्हापुर - नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी -आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

६. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, पुणे, सांगली व कोल्हापुर यांची राहील. तसेच अतिप्रदान व अखर्चित निधी परतावा शासनास भरणा (जमा) करण्याबाबत वित्त विभागाच्या सूचनांनुसार जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

७. सदरचा खर्च करताना वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वांचा/ CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तींचा भंग होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

८. सदरचा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार आणि त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ व दि.१४ ऑक्टोबर, २०२१ मधील अटींची पुर्तता होत असल्याने प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. प्रस्तावास अनौपचारिक संदर्भ क्र.३९०/१४७१, दि.२२/१२/२०२१, अन्वये नियोजन विभागाची तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.३६७/२०२१/व्यय-१, दि.२२/१/२०२२ अन्वये वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२२०२०४१५३५३९२३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE80686E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.02.04 15:36:09 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई / नागपूर,
२) महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर,
३) जिल्हाधिकारी, पुणे, सांगली , कोल्हापुर
४) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई
५) प्राचार्य/अध्यक्ष/संचालक (अल्पसंख्याक मुलींचे शासकीय वसतिगृह, शासकीय तंत्रनिकेतन, संस्था, पुणे, शासकीय तंत्रनिकेतन, मिरज, जिल्हा-सांगली व राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर)
६) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती) विभाग, पुणे
७) कार्यकारी अभियंता , सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती) विभाग, पुणे
८) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई,
९) अवर सचिव, का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की त्यांनी उक्त रकमा संबंधिताना कृपया B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन देण्यात याव्यात.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, सांगली, कोल्हापुर
११) वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय-१) मंत्रालय, मुंबई
१२) नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१३) निवड नस्ती, कार्यासन-८.